आदिवासी / नक्षलग्रस्त भागासाठी विशेष कृती कार्यक्रम - वरिष्ठ वेतनश्रेणी व प्रोत्साहन भत्ता भारतीय प्रशासन सेवेतील अधिका-यांना अनुज्ञेय करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग,

परिपत्रक क्र. एईओ-११०२/प्र.क्र.४९८/२००२/दहा,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- १८.६.२००३

## परिपत्रक

शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.नं.३१/का-५, दिनांक ९.३.१९९० अन्वये आदिवासी उपयोजनेचे क्षेत्र विहीत करण्यात आले आहे. त्यानुसार १५ जिल्ह्यातील ६८ तालुक्यामधून एकूण ६२६२ गावे व १३ शहरे आदिवासी उपयोजना क्षेत्र म्हणून जाहीर करण्यात आले आहे.

२ शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-टिआरएन-२०००/प्र.क्र.३/१२, दिनांक ६.८.२००२ अन्वये आदिवासी व नक्षलग्रस्त क्षेत्रात काम करण्यासाठी प्रोत्साहन भत्ता व वरिष्ठ वेतन श्रेणीची योजना कार्यान्वित करण्यात आली आहे.

३ या शासन निर्णयाचा लाभ भारतीय प्रशासन सेवेतील अधिका-यांना अनुज्ञेय करण्यासाठी पुढीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत.

खाली नमूद केलेल्या अधिका-यांना उपरोक्त दिनांक ६.८.२००२ च्या शासन निर्णयामधील अटीच्या अधीन राहून दिनांक १.७.२००२ पासून वरिष्ठ वेतन श्रेणी व दिनांक ६.८.२००२ पासून प्रोत्साहन भत्ता **अथवा** संबंधित अधिकारी त्या पदावर कार्यरत असल्याच्या दिनांकापासून **अथवा** या पैकी जे नंतर घडेल त्या दिनांकापासून ते त्या पदावर कार्यरत असल्याच्या दिनांकापर्यंत अनुज्ञेय करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **जिल्हा** | **पदधारक / पदनाम** |
|---|---|---|
| १ | गडचिरोली | अ) जिल्हाधिकारी, गडचिरोली<br>ब) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली<br>क) सहायक जिल्हाधिकारी, गडचिरोली<br>ड) अधिसंख्य सहायक जिल्हाधिकारी, गडचिरोली<br>इ) या शिवाय, गडचिरोली जिल्ह्यात अन्य पदावर भा.प्र.से. अधिका-याची नियुक्ती झाल्यास ते पद. |
| २ | नंदुरबार | अ) जिल्हाधिकारी, नंदुरबार<br>ब) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार<br>क) सहायक जिल्हाधिकारी, नंदुरबार ***(जर संबंधित उप विभागाचे मुख्यालय विहीत ६८ तालुक्यापैकी एक असेल तर)***<br>ड) अधिसंख्य सहायक जिल्हाधिकारी, नंदुरबार. |

या शिवाय भा.प्र.से. अधिका-यांची नियुक्ती आदिवासी विकास विभागाच्या उपरोक्त दि.९.३.१९९० च्या शासन निर्णयान्वये विहीत केलेल्या ६८ तालुके समाविष्ट असणा-या उप विभागात सहायक जिल्हाधिकारी / उप

**कृ.मा.प.**

विभागीय अधिकारी म्हणून झाल्यास व त्या उप विभागाचे मुख्यालय या ६८ तालुक्यापैकी एक असल्यास त्यांना सुध्दा वरीलप्रमाणे लाभ अनुज्ञेय करण्यात येत आहे.

४. वरीलप्रमाणे वरिष्ठ वेतन श्रेणी व प्रोत्साहन भत्ता याचा लाभ या अधिका-यांना त्या पदावर कार्यरत असेपर्यन्तच अनुज्ञेय राहील. भा.प्र.से. अधिका-यांच्या वेतन श्रेणी पुढील प्रमाणे आहेत.

(१) कनिष्ठ समय श्रेणी - रु.८,०००-२७५-१३,५००/-
(२) वरिष्ठ समय श्रेणी - रु.१०,६५०-३२५-१५,८५०/-
(३) कनिष्ठ प्रशासनिक श्रेणी - रु.१२,७५०-३७५-१६,५००/-
(४) निवड श्रेणी - रु.१५,१००-४००-१८,३००/-
(५) अधिकालिक वेतन श्रेणी - रु.१८,४००-५००-२२,४००/-

तरी संबंधित भा.प्र.से. अधिकारी ज्या श्रेणीत कार्यरत असेल त्यांच्या पुढील वेतन श्रेणीत त्यांचे वेतन निश्चित करण्यात येऊन वर नमूद केल्याप्रमाणे पदांवर कार्यरत असे पर्यन्तच्या कालावधीत अदा करण्यात यावे. तसेच अनुज्ञेय दराने प्रोत्साहन भत्ता अदा करण्यात यावा.

५. वर नमूद केलेल्या पदांवरून संबंधित अधिका-यांची अन्यत्र बदली झाल्यास त्यांना पुन्हा त्यांच्या मुळ वेतन श्रेणीत वेतन अदा करण्यात यावे. याबाबत संबंधित अधिका-यांच्या अंतिम वेतन प्रमाणपत्रात त्यांच्या मुळ वेतन श्रेणीचा उल्लेख करण्याची दक्षता संबंधित लेखा अधिकारी / आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(चारूशीला सोहनी)
**प्रधान सचिव (सेवा), महाराष्ट्र शासन**

प्रती :-

१. प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग,
२. सचिव (ग्रामविकास), ग्रामविकास व जल संधारण विभाग,
३. सचिव, आदिवासी विकास विभाग,
४. सर्व विभागीय आयुक्त,
५. सर्व जिल्हाधिकारी,
६. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
७. सर्व लेखा अधिकारी / आहरण व संवितरण अधिकारी, जिल्हाधिकारी, जिल्हा परिषद कार्यालये,
८. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, सर्व जिल्हा परिषद,
९. सर्व जिल्हाधिकारी व जिल्हा परिषद कार्यालये,
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई, नागपूर,
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१२. मुख्य लेखा परीक्षक (निवासी लेखा), कोकण भवन, नवी मुंबई,
१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१४. सहाय्यक संचालक (लेखा), सामान्य प्रशासन विभाग/९-अ,
१५. सामान्य प्रशासन विभाग/का-१, ९, १०-अ व १२,
१६. निवड नस्ती.

C:\My Documents\Mkulkarni\note.doc